

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्र ०२२ २२०२ ५१३२ Email ID : home_special1b@maharashtra.gov.in

---

क्रमांक- आरएलपी- ११२०/प्र.क्र.१९८/विशा १ ब दिनांक- १९ नोव्हेंबर, २०२०.

**विषय- छठपूजा उत्सव, २०२० मार्गदर्शक सूचना**

**परिपत्रक**

कोविड- १९ मुळे उद्भवलेल्या संसर्गजन्य परिस्थितीचा विचार करता उत्तर भारतीय नागरिकांनी यावर्षीचा छठपूजा उत्सव साधेपणाने साजरा करणे आवश्यक असून त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत. :-

१) कोरोनाचा संसर्ग वाढू नये यादृष्टीने नागरीकांनी तलाव/समुद्राकाठी एकत्रित न येता गर्दी टाळावी व घरीच थांबून साध्या पध्दतीनेच छठपूजा साजरी करावी.

२) महानगरपालिका, लोकप्रतिनिधी, स्वयंसेवी संस्था इ. च्या मदतीने कृत्रिम तलावांची निर्मिती करण्यात यावी. तसेच कोरोनाचा प्रादुर्भाव होऊ नये याकरीता सुरक्षा व स्वच्छतेच्या दृष्टीने योग्य त्या उपाययोजना कराव्यात.

३) छठपूजा उत्सवाच्या ठिकाणी कोणत्याही स्वरुपाचे मंडप उभारण्यात येऊ नयेत. तसेच कोणत्याही प्रकारचे धार्मिक, सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करण्यात येऊ नयेत. फटाक्यांची आतिषबाजी व ध्वनीक्षेपणास बंदी असेल.

४) उत्तर भारतीय नागरीकांनी छठपूजेदरम्यान मास्कचा वापर व सोशल डिस्टन्सींगचे पालन करावे तसेच जेष्ठ नागरीक व लहान मुलांना कार्यक्रमाच्या ठिकाणी आणू नये. यासंबंधी आयोजकांनी जनजागृती करावी.

५) छठपूजा कार्यक्रमाच्या ठिकाणी निर्जंतुकीकरणाची व्यवस्था करण्यात यावी. तसेच सोशल डिस्टन्सींग तसेच स्वच्छतेचे नियम (मास्क, सॅनीटायझर इ.) पाळण्याकडे विशेष लक्ष देण्यात यावे.

६) कोविड -१९ या विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासनाच्या मदत व पुनर्वसन, आरोग्य, पर्यावरण, वैद्यकीय शिक्षण विभाग, तसेच संबंधित महानगरपालिका, पोलीस, स्थानिक प्रशासन यांनी वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांचे काटेकोर पालन करावे. तसेच या परिपत्रकानंतर व प्रत्यक्ष उत्सवाच्या दिवसाच्या मधल्या कालावधीत काही सूचना नव्याने प्रसिध्द झाल्यास त्यांचे देखील अनुपालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२०१११९१२४७३७२३२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2020.11.19 12:51:41 +05'30'

**(संजय खेडेकर)**
उप सचिव, गृह विभाग.

प्रत माहिती तथा आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मा. महापौर, महानगर पालिका
१२. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१६. सचिव व महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७. सर्व आयुक्त, महानगर पालिका.
१८. सर्व पोलीस आयुक्त.
१९. सर्व जिल्हाधिकारी.
२०. सर्व पोलीस अधीक्षक.
२१. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका.
२२. निवडनस्ती.